**शमिम आझाद एज्युकेशन सोसायटी, गिरोली, ता.मानोरा, जि.वाशिम संचालित गुलामनबी आझाद उर्दु माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, वाशिम या शाळेचे मारिया अल्पसंख्यांक सेवाभावी संस्था, देगलूर, नांदेड, या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशाह-३३२२/प्र.क्र.३२६/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०३ मार्च, २०२३

<u>वाचा</u> : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/(२१०/११)/माशि-३ दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

<u>संदर्भ</u> : विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांचे जा.क्र. शिउसं/प्राथ/क/४५२९/२०२२ दि. ३०.०६.२०२२ चे पत्र.

**<u>प्रस्तावना :</u>**

शमिम आझाद एज्युकेशन सोसायटी, गिरोली, मानोरा, वाशिम संचालित गुलामनबी आझाद उर्दु माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, (इयत्ता ५ वी ते १० वी: अनुदानित, इयत्ता ११ वी व १२ वी कला व विज्ञान शाखा: अंशत: अनुदानित, इयत्ता ११ वी व १२ वी विज्ञान शाखा प्रत्येकी एक तुकडी स्वयंअर्थसहाय्यित) या शाळेचे मारिया अल्पसंख्यांक सेवाभावी संस्था, देगलूर, जि.नांदेड या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :</u>**

सदर शाळेचे व्यवस्थापन मारिया अल्पसंख्यांक सेवाभावी संस्था, देगलूर, नांदेड या संस्थेकडे हस्तांतरीत करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(४) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(५) सदर व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तींचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांनी सर्व बाबी तपासून व वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त आवश्यक अटींचा समावेश करून, शाळेचे व्यवस्थापन बदलाबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०३१८१०००७३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2023.03.03 18:14:23 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
३) शिक्षणाधिकारी (माध्यमिक व उच्च माध्यमिक), वाशिम
४) अध्यक्ष/ सचिव, शमिम आझाद एज्युकेशन सोसायटी, गिरोली, मानोरा, वाशिम.
५) अध्यक्ष/ सचिव, मारिया अल्पसंख्यांक सेवाभावी संस्था, देगलूर, नांदेड.
६) निवडनस्ती (एसएम-१).